**महाराष्ट्र शासन**

**क्रमांक: सावियो-२०२३/प्र. क्र. ४६१ /अजाक** **सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १६ जुलै, २०२४.

विषय: भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना मौजे मिरगव्हाण, ता. भुसावळ, जि. जळगांव येथे संत रविदास भवन बांधण्याबाबत.

**संदर्भ:** १. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र, दिनांक ११ डिसेंबर, २०२३.
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०५ जानेवारी, २०१५.

**ज्ञापन:**

आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भांकित पत्रान्वये भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजनेंतर्गत मौजे मिरगव्हाण, ता. भुसावळ, जि. जळगांव येथे संत रविदास भवन बांधण्याबाबतचा प्रस्ताव सादर केलेला आहे.

२. मौजे मिरगव्हाण, ता. भुसावळ, जि. जळगांव येथे संत रविदास भवन बांधण्याच्या आराखडा/ नकाशा ARCHITECH NITIN PARGAONKAR, जळगांव यांनी तयार केलेला आहे. सदर बांधकामाचे रुपये १३३४.७३ लक्ष इतक्या रकमेचे अंदाजपत्रक उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, भुसावळ यांनी तयार केलेले असून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) विभाग, जळगांव यांनी साक्षांकित केलेले आहे. सदर बांधकामाचे अंदाजपत्रक SSR Circular, Public Works Region, Nashik for the year 2022-23प्रमाणे आहे. सदर अंदाजपत्रकाच्या RECAPITULATION SHEETवर मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी स्वाक्षरी केलेली आहे.

३. सदर अंदाजपत्रकाची सार्वजनिक बांधकाम विभागाने (क्षेत्रिय स्तरावरील) तपासणी केलेल्या रुपये १३३४.७३ लक्ष इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. सदर मान्यता शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १७ एप्रिल, २०१५ व २० सप्टेंबर, २०१९ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-१, उप विभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्रमांक १३४ (३) अनुक्रमांक ३मधील सुधारित अट १(अ) अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

५. सदर मौजे मिरगव्हाण, ता. भुसावळ, जि. जळगांव येथे संत रविदास भवन बांधण्याबाबतच्या कामासाठी येणारा खर्च :

मागणी क्रमांक एन-३
मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण,
०१, अनुसूचित जातींचे कल्याण,
(०४) भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना

(०४) (०१) भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना
(अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम)
२७, लहान बांधकामे
२२२५ F ०८५

या अंतर्गत सन २०२४-२५ या चालू वर्षासाठी उपलब्ध असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

६. सदर संत रविदास भवन बांधण्याची सुरुवात सन २०२४-२५ या आर्थिक वर्षापासून सुरु करण्यात यावी.

७. संदर्भांकित परिपत्रकाप्रमाणे म्हणजेच सन २०२४-२५ या वर्षासाठी निधी उपलब्धतेच्या अधिन राहून / वित्त विभागाकडून उपलब्ध होणाऱ्या निधीच्या अधिन राहून रुपये ४५०.०० लक्ष निधी वितरीत केला जाईल. तद्नंतर सन २०२५-२६ व २६-२७ या वर्षांसाठी अनुक्रमे रुपये ४५०.०० लक्ष व रुपये ४३४.७३ लक्ष निधी वितरित करण्यात येईल.

८. सन २०२३-२४साठी वितरित करण्यात आलेल्या रुपये ४५०.०० लक्ष निधीचा विनियोग झाल्याचे जिल्हाधिकारी, जळगांव यांच्या स्वाक्षरीचे कागदपत्रे/ उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. सदर कागदपत्रे/ उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर झाल्यावर या कार्यासनाशी (अजाक) संबंधित अधिकारी प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, नाशिक किंवा सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, जळगांव यांच्यासह प्रस्तुत संत रविदास भवनाची स्थळ पाहणी करतील. सदर संबंधित अधिकारी स्थळ पाहणी करुन पुढील वर्षासाठी निधी वितरित करण्याबाबत ना हरकत प्रमाणपत्र देतील. सदर ना हरकत प्रमाणपत्र दिल्यानंतर सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, जळगांव यांच्यामार्फत दुसऱ्या वर्षासाठी निधीची मागणी करण्यात यावी. त्यानंतर शासनाकडून प्रस्तुत प्रस्तावास निधी वितरित करण्यात येईल.

९. सदर मौजे मिरगव्हाण, ता. भुसावळ, जि. जळगांव येथे संत रविदास भवन बांधताना विषयांकित योजनेचे नियम, तरतुदी, बाबी, अटी आणि वित्तीय अधिकारांतर्गत असलेल्या अटी यांचे पालन होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१०. तसेच, मौजे मिरगव्हाण, ता. भुसावळ, जि. जळगांव येथे संत रविदास भवन बांधताना पुढील बाबींची पूर्तता करण्याची जबाबदारी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील संबंधित सहाय्यक आयुक्त, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त व आयुक्त यांची राहील :

अ. काम सुरु करण्यापूर्वी नमूना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजुरी घेऊनच सुरु करावे.

ब. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

क. प्रत्यक्ष काम करतेवेळी शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्रमांक: इएनव्ही-२०१३/ प्र. क्र. १७७ / तां. क. १, दिनांक १० जानेवारी, २०१४मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक: बीडीजी - २०१७/ प्र. क्र. ६०/ इमा-२, दिनांक ०७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

ई. नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुनच सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

फ. सदर अंदाजपत्रकावर उपभोक्ता विभागाच्यावतीने सक्षम प्राधिका-याचे साक्षांकन आवश्यक आहे.

११. सदर ज्ञापन शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १७ एप्रिल, २०१५ व २० सप्टेंबर, २०१९ यातील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन **ज्ञापन** महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१६१८५३५६९२२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN VILAS SHISHUPAL

Digitally signed by PRAVIN VILAS SHISHUPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=e90b11f238d671a8222f53575baf1f02e1625f1f53f35c695b531bcd5b6b83fa, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=CBD05D0EA86861C0C1248FD89817636DDFBE5E50BA12759A0FE7E022D790310B, cn=PRAVIN VILAS SHISHUPAL
Date: 2024.07.18 15:57:59 +05'30'

**( प्रविण शिशुपाल )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. जिल्हाधिकारी, जळगांव,
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक,
४. प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, नाशिक,
५. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगांव,
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (उत्तर) विभाग, जळगांव,
७. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, जळगांव,
८. उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, भुसावळ, जि. जळगांव,
९. ग्रामसेवक, वांजोळा मिरगव्हाण ग्रुप ग्रामपंचायत, ता. भुसावळ, जि. जळगांव.